**शासकीय आश्रमशाळांमध्ये संगणक शिक्षक/निर्देशक हे पद कंत्राटी पद्धतीने भरण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- शाआशा-२०१८/प्र.क्र.४८९/का.१३**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : १५ डिसेंबर, २०१८.

**प्रस्तावना:-**

२१ व्या शतकातील आव्हानांचा समर्थपणे मुकाबला करण्यासाठी संगणक ज्ञानाची नितांत गरज आहे. त्यामुळे संगणकधारित शिक्षण ही काळाची गरज निर्माण झाली आहे. सर्व शासकीय आश्रमशाळांमध्ये नजिकच्या काळात सुसज्ज संगणक कक्ष स्थापन करण्यात येणार आहे. आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना संगणकीय ज्ञान देण्यासाठी तज्ञ व प्रशिक्षित संगणक शिक्षकांची गरज आहे. परंतु, आश्रमशाळांमध्ये संगणक शिक्षक/निर्देशकाचे पद मंजूर नसल्याने आश्रमशाळेतील विध्यार्थ्यांना संगणकाच्या ज्ञानापासून वंचित रहावे लागत आहे. सबब, शासकीय आदिवासी आश्रामशाळांमध्ये संगणक शिक्षक/निर्देशक हे पद अत्यंत तात्पुरत्या स्वरुपात प्रत्येक आश्रमशाळेत कंत्राटी पद्धतीने नेमण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

१. शासकीय आदिवासी आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांना संगणकाचे ज्ञान देणे तसेच संगणकाच्या माध्यमाद्वारे शालेय अभ्यासक्रमाचे विषय शिकविण्यास विषय शिक्षकांना तांत्रीक मदत करण्यासाठी राज्यातील प्रत्येक शासकीय आश्रमशाळेत एक संगणक शिक्षक/निर्देशक (Instructor) कंत्राटी पध्दतीने नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. संगणक शिक्षक/निर्देशक या पदासाठी प्रतिमाह रु.२०,००० /- (रुपये वीस हजार फक्त) इतके एकत्रित मानधन देय राहील.

३. शासकीय आश्रम शाळांसाठी संगणक शिक्षक/निर्देशक निवड करण्याकरिता प्रत्येक जिल्ह्यात पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यात यावी.

(१) संबंधित प्रकल्प कार्यालयाच्या जिल्हयाचे जिल्हाधिकारी अथवा अपर जिल्हाधिकारी -- अध्यक्ष

(२) संबंधित जिल्ह्याचे शिक्षणाधिकारी ( माध्यमिक ) -- सदस्य
(३) शासकीय तंत्रनिकेतन /अभियांत्रिकी महाविद्यालयातील संगणक विभाग प्रमुख -- सदस्य
(४) संबंधित प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प -- सदस्य सचिव

४. संगणक शिक्षक/निर्देशक हे पद भरण्यासाठी खालील अटी राहतील :-

अ) सदर पदांची नेमणूक ही पूर्णतः कंत्राटी/बाह्यस्त्रोत पद्धतीने असेल.

आ) या पदावरील कर्मचारी यांना शासकीय कर्मचारी म्हणून गणले जाणार नाही.

इ) शासनाच्या प्रचलित धोरणानुसार उमेदवारांची निवड करण्यात येईल.

ई) प्रथमत: ११ महिन्यांसाठी नियुक्ती देण्यात येईल. समाधानकारक सेवा विचारात घेऊन ११ महिन्यानंतर करारनाम्याची मुदत वेळोवेळी वाढवता येईल. तथापि, अशी मुदत वाढवितांना एकावेळी ही मुदत ११ महिन्यांपेक्षा अधिक असणार नाही याची काळजी नियुक्ती प्राधिकारी यांनी घ्यावी. अशाप्रकारे जास्तीत जास्त २ वेळा मुदतवाढ देता येईल. प्रत्येक वेळी मुदतवाढ देतांना मागील वार्षिक कामाचा आढावा घेऊन समाधानकारक शेरा असल्यास अशा उमेदवारांनाच मुदतवाढ द्यावी.

उ) दोन मुदतवाढीनंतर अशा उमेदवारांची पुनःश्च नियुक्ती करणे आवश्यक राहील.

ऊ) शासकीय आश्रमशाळेसाठी संगणक शिक्षक/निर्देशकाची नियुक्ती करतांना हे पद नियमित करण्याची अथवा अन्य मंजूर पदांमध्ये समायोजन करण्याची उमेदवारांकडून केलेली कोणतीही मागणी/विनंती मान्य करता येणार नाही. तसेच केव्हाही कारण न दाखवता त्यांना सेवेतून कमी करण्यात येईल, याचा करारनाम्यामध्ये स्पष्ट उल्लेख करावा.

५. संगणक शिक्षक/निर्देशकाची निवड करण्यासाठी खालील बाबी विचारात घेण्यात याव्यात:-

१) संगणक शिक्षक/निर्देशकाच्या निवडीकरीता विविध प्रसार माध्यमांद्वारे जाहिराती देण्यात याव्यात.

२) सदर निवडीच्या जाहिरातीबाबत वरिष्ठ विज्ञान व अभियांत्रिकी महाविद्यालय यांना विशेष अवगत करावे.

३) संगणक शिक्षक/निर्देशकाच्या निवडीसाठी B.Sc.(CS/IT) किंवा B.C.A. किंवा B.E.(computer), B.Tech. Computer व तत्सम पदवी हि किमान शैक्षणिक पात्रता असणे आवश्यक आहे. तसेच उच्चशिक्षित (M.C.A./M.Sc. in computer/IT) व अनुभवी उमेदवारास प्राधान्य देण्यात यावे .

४) मुलींच्या आश्रमशाळेत महिला संगणक शिक्षक/निर्देशकाची निवड करण्यात यावी.

५) संगणक शिक्षक/निर्देशकाच्या निवडीसाठी जिल्ह्यातील स्थानिक उमेदवार उपरोक्त नमूद पात्रता धारण करीत असल्यास त्यांना प्राधान्य देण्यात यावे.

६. संगणक शिक्षक/निर्देशक यांच्या जबाबदाऱ्या खालीलप्रमाणे राहतील.

अ) इ. ५वी ते १२ वी पर्यंतच्या विद्यार्थ्यांना संगणकाचे शिक्षण देणे.

आ) ई-लर्निंग पध्दतीने विद्यार्थ्यांना शिकविण्यासाठी विषय शिक्षकांना तांत्रिक मदत करणे.

इ) शालेय कार्यालयीन कामासाठी संगणकाशी संबंधित (उदा.माहिती तयार करणे, शालार्थ व सरल, आर्थिक देयके इ.) करण्यासाठी तांत्रिक बाबतीत मदत करणे.

ई) संगणक कक्षाच्या वापरावर सनियंत्रण करणे.

७. सदर पदाचे मानधन या बाबींवर येणारा खर्च “आश्रमशाळा समूह (2225 D-734)” या लेखाशीर्षाखालील ०२ मजुरी या खालील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२१५१७१९३२१४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2018.12.15 17:27:02 +05'30'

**( सु. ना. शिंदे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.४०० ०३२.

३. मा.मंत्री (आदिवासी विकास), मंत्रालय, मुंबई- ४०० ३२.

४. सर्व मा. मंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. मा. राज्यमंत्री ( आदिवासी विकास ), मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२.
६. सर्व मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. सर्व मा. विधानसभा सदस्य.
८. सर्व मा. विधानपरिषद सदस्य.
९. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०. मा. सचिव, आदिवासी विकास, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११. मा. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
१३. मा. निबंधक, उच्च न्यायालय, मुंबई, / खंडपीठ नागपूर / खंडपीठ औरंगाबाद.
१४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
१५. सर्व जिल्हाधिकारी.
१६. सरकारी अभियोक्ता, उच्च न्यायालय, मुंबई / नागपूर / औरंगाबाद.
१७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, आदिवासी विकास महामंडळ मर्या. नाशिक
१८. अपर आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य नागपूर / नाशिक/ ठाणे / अमरावती.
१९. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२०. शिक्षण संचालक, (उच्च शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे.
२१. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
२२. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
२३. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
२४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२६. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
२७. सर्व उप सचिव/ अवर सचिव/कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२८. उप सचिव (व्यय-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२९. सर्व मुख्याध्यापक शासकीय आश्रमशाळा (प्रकल्प अधिकारी यांच्यामार्फत)
३०. निवडनस्ती (का-१३) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२.

********